ई - साहित्य प्रकाशन
वर्ष : दूसरे, अंक : ३३
दिनांक : २९.११.२०१०

# Mens n Roses

## नेटअक्षरी



**संपादक -**
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

**सहसंपादक -**
सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
सचिन काकडे ( मुंबई )

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com

# संपादकीय

फुलं आणि स्त्रियांचं नातं खुप घट्ट असतं.रंगसुगंधाची उधळण करणाऱ्या नाजुक फुलांना तितक्याच सुकोमल भावनांच्या दोऱ्यात गुंफून स्त्रिया अभिव्यक्त होत असतात.

आणि,पुरुष मात्र वास्तविकतेच्या जहाल निखाऱ्यांवर मार्गक्रमणा करत असतात.ते लिहणार राजकारण,भ्रष्टाचार, अन्याय अशा काटेरी विषयांवरच.त्यांची अभिव्यक्तीही तशीच उग्र स्वरुपाची असते.असा एक सर्वसाधारण समज असतो.Men are Rough-Tough n women are Softy.. आणि,त्यातल्या त्यात फुलं म्हणजे स्त्रियांची मक्तेदारी.फुलांना कवितांच्या गजऱ्यात स्त्रियांनीच गुंफावं..

ह्याच समजाला छेद देणाऱ्या नेटाक्षरीच्या ह्या सुगंधी अंकात ‘मोगरा’ ह्या नाजुक अन सुगंधी फुलावर चक्क पुरुषांनी केलेल्या लाजवाब कविता घेऊन आम्ही आलो आहोत.मोगरा ह्या नाजुक फुलाबरोबर पुरुष मनाचं गहिरं नातं जोडलं गेलेल्या ह्या कविता वाचून तुमचं मनही फुलाच्या सुकोमल पाकळ्यांइतक्या नाजूक भावनांनी फुलून येईल and my dear Friends,there is nothing wrong to get Senti or softy..

महत्वाचं असतं व्यक्त होणं..आपल्या अव्यक्त भावनांना वाट करुन देणं..

फुलं असोत वा काटे..तारे असो वा निखारे..

निसर्गातल्या प्रत्येक रुपाशी जे तादात्म्य पावतं तेच खरं जिवंत मन..मुर्दादिल क्या खाक जिया करते है ?

- *स्वप्ना कोल्हे ( नाशिक )*
*संपादक*

# Mens n Roses



## ...मोगरा फुलला....

हाय मला ठाऊक नाही , मोगरा फुलला कसा
का असा भावुक झालो , दूर सारा आरसा

मोगऱ्याचा गंध होता
मोगरा घेऊन गेला
कळ्या थोड्या उद्यासाठी
मोगरा माळून गेला
मोगऱ्याची सावली
मोगऱ्याचा कवडसा
हाय मला ठाऊक नाही , मोगरा फुलला कसा

श्वास बनूनी मोगरा
जीवनातून वाहिला
चुरडतांना पाकळ्या
अत्तरातून सांडला
वाऱ्यावर झुलतो मोगरा
विहरतो दाही दिशा
हाय मला ठाऊक नाही , मोगरा फुलला कसा

मोगऱ्याचा स्पर्श आहे
ओंजळीला माझ्या जरी
वार त्याचा झेलला मी
खोल माझ्या अंतरी
मोगरा होता शहाणा
मोगरा वेडापिसा
हाय मला ठाऊक नाही , मोगरा फुलला कसा

- मंदार चोळकर,पुणे



## ....मोगरा....

काय सांगू यार हो
असा सजून येतो मोगरा
बहरतो माझ्या मनी
अन त्रास देतो मोगरा

तेव्हाची साथ आहे
जेव्हा हाती माळला मोगरा
मादक मंद सुरेखीत
कमनीय आहे मोगरा

याच मोगऱ्याने केले होते
सुगंधी वार माझ्यावरी
आज त्याच जखमांवरी
न्यौछावर झालाय मोगरा

आहे माझ्यासवे आज
मैफलीला मोगरा
बरसून गेल्यावरीही
आसुसलेला मोगरा

ओलेत्या मनी
मोगऱ्याचा सुगंध गंधाळला
अन स्मृतीत आठवांच्या
मी हरवलेला
एकला

- मकरंद बेहेरे,मुंबई



## ....मोगरा....

भाग्य वाटे मोगऱ्याला
केसात कुणाच्या कुजण्याचे

पण गजऱ्यात कुणाच्या माळण्याची
मोगऱ्यासी लाज वाटे
मोगऱ्याला गर्व आहे
गंध हवेला दिधण्याचा
पण हवा ती मनांशी खेळेल याची
भीती वाटते मोगऱ्याला

मोगरा,ते फुल आहे
देवघराशी मोक्षलेले

तो मज हवा तो शब्द आहे
जिथे तिथे सांडलेला मोगरा
मनाची साथ मोगरा
उन्मत्त सुगंध मोगरा
हाक मोगरा
मोगरा

- चिन्मय कानिटकर,पुणे



## ....मोगराच तो....

मोगराच तो
त्याचा गंध दरवळणारच
गंध धुंदही करणारच
काय सुगंधी होते ते दिवस
त्या मोगऱ्याने नटलेली सुगंधी मी
अन त्या सुगंधाने धुंद तू
रोज कामावरुन येतांना
आठवणीने आणायचास माझ्यासाठी गजरा
मला गंधित करुन स्वतः धुंद होण्यासाठी
मग उगवल्या त्या काळरात्री
ते कठीण दिवस,तो त्रास,ती परवड
दोन जीवांची जातांना मी
परत आले एकटी..
एकटीच तनाने अन मनाने खचलेली
तू वरवर गंभीर पण आतून पार हललेला
माझ्या त्या पार हरवलेल्या रुपाला बघून
अस्वस्थपणे वावरणारा
त्या कठीण दिवसात मला सांभाळून घेत
माझ्या लांबसडक वेणीची झालेली
उंदराची शेपटी बघून उसासे सोडणारा
त्यादिवशी अचानक तू गजरा घेऊन आलास
आणि लक्षात आल्याबरोबर
त्या गजऱ्याला खिशातच चुरगळून टाकलंस
पण मोगराच तो,बेईमान झालाच
गंध तोच,पण धुंदी उतरवून गेला
आजकाल तू गजरा आणतही नाहीस
मी सुगंधी होतही नाही
आणि तू पण धुंद होत नाही

- सुनील जोशी,नागपूर



## ....मोगरा....

तुझ्या गजऱ्यातून निखळलेला मोगरा
नेमका मागच्या बाकावर बसलेल्या
माझ्या वहीत पडला
कुणी बघत तर नाही ना ?

हळूच मिटलेली ती वही
मग पुन्हा पुन्हा उघडून बघण्याचं वेडच लागलं मला

आजही मी तो जपलाय
त्याच पानावर
अन दरवळतोय तोच
माझ्या कवितेच्या वहीत
पानोपानी

आणि,वेडे माझे मित्रं म्हणतात
व्वा ! किती छान लिहीतोस !

- प्रतिक खिसमतराव,मुंबई

## ....बहरला असा हा मोगरा....



माळला मी मोगरा केसात माझ्या धुंद किती मी झाले,हरवले स्वप्नात तुझ्या काय काय नाही मी मिळवले
हळूच येतो वाऱ्यासरशी मोगऱ्याचा गंध करतो मला वेडे,तूच माझ्या स्वप्नी का येतोस हे कोडे सारखे मला पडे
घातला मी मोगरा वेणीत रुळते ती वेडी माझ्या वक्षी,हलकेच माझ्या मनाला ती सांगते तुझ्या गुजगोष्टी
येवून स्वप्नी लावतो तो वेड कसा करतो असा मुग्ध,हरवून जाते मी बापडी उडून जाती मग सारेच लाजबंध
काल तू काय केलेस येवूब माझ्या स्वप्नी,कुठे हरवलीत ती काही फुले सांग बघू नक्की
का असे कुस्करलेस,का असे चुरगाळलेस आम्हाला,
चिडून चुरगळलेली फुले सांगती कैफियत आम्हाला
त्यांची सुगंधी तक्रार का कोणी ऐकून घेत असते ?
चुरगळलेल्या फुलांची का कोणाला काळजी असते
हुरहूर किंवा काळजी असते ती उरलेल्या फुलांना,
कधीना कधी तीही मोहित होतील ह्याच क्षणांना
चुंबिता तू माझ्या अधरांना दिला मी मानेला असा झटका
पाठीच्या आधाराला गेली वेणी ठेवून राग तो लटका
हात तुझा फिरता पाठीवरती,अंग अंग माझे मोहरते
बाकदार त्या कमानीवरुनी एक एक फुल मग ओघळते
घेतलीस तू मिठीत मजला,धुंदीत गेली सारी फुले
आपल्या आवेगा पुढती कोणाचे म्हणून काही न चले
भान मग कोणाला कशाचे,फुलांची पर्वा कोणा असे
राहतील किती तुटतील किती ह्याचे कोणा वावडे असे
येता बहर तो प्रितीला फुलेल माझे यौवन देह सारा उमलेल
प्रेमाच्या या बहरा पुढती मोगऱ्याचा बहर तो कसा मग टिकेल
मखमली आणि रसाळ देहावरती नाव तू तुझे कितीदा कोरशील
मोगऱ्याला मात्र रात्र रात्र तू असाच बेभानपणे कितीदा छळशील
नको न येवूस असा स्वप्नी माझ्या,बघ मी हा मोगरा उतरवला
लाजून लाजून वेडा चूर झाला,उमलायचे कसा विसरला
असे काय बरे हे तुझे वागणे,कोण मला काय म्हणेल
सांग मला लाजलेला मोगरा कसा माझ्या अंगणात फुलेल
उगाच काय बरं स्वप्नात येवून तुझा हा धीटपणा , जा आता मी बोलतच नाही
सांगितले न तुला मी नाही घालणार मोगरा,नाही मी घालणार मोगरा पुन्हा कधी असा

- महेश उकिडवे,ऑस्ट्रेलिया



## ....हे फक्त मोगऱ्यालाच कळते....

जर तर
प्रेमात असतं तर ?
लोक प्रेमात पडलेच नसते

जर तर
सुगंधात असता तर
मोगऱ्याचा सुगंध पसरलाच नसता

जर तर
मोगऱ्यात असता तर
मोगराही प्रेमिकांच्या मध्ये आला नसता

मर
जर तर
कर प्रेम
सोड जर तर
प्रेम कर

प्रेम फुलण्यासाठी असते
प्रेम खुलण्यासाठी असते
प्रेम सुगंध पसरवण्यासाठी असते
प्रेम पांढऱ्या रंगाप्रमाणे निर्मळ असते
हे फक्त मोगऱ्यालाच कळते

- अतुल मुळे,पुणे



## ....मोगरा फुलला....

जयाच्या अमृतवाणीने गीतेचा भावार्थ साधला
तया ज्ञानियाच्या पसायदानी मोगरा फुलला

जया नाथांच्या घरी विठूराया राबला
तयांच्या भारुडातूनी भक्तिचा मोगरा फुलला

इंद्रायणीनेही आपल्या मस्तकी जयाचा अभंग धारण केला
तया तुकोबांच्या देही मोगरा फुलला

परमार्थासवे नेटका प्रपंच जयांनी उपदेशिला
तया समर्थांच्या बोधातूनी मोगरा फुलला

केवळ श्रींच्या इच्छेने जयांनी स्वराज्य मेरु पेलला
तया सिवरायांच्या शौर्य किर्तींचा मोगरा फुलला

स्वराज्य माझा हक्क या डरकाळीने केसरी गर्जला
लोकमान्यांच्या लेखातूनी जागृतीचा मोगरा फुलला

किती सांगावे कौतुक काय गाईन महती
महाराष्ट्री हे जन्म घेती धन्य इथली ही माती

गुण गायचा हा यत्न यथामती मी साधला
कृतार्थ झालो या जीवनी मोगरा फुलला

- प्रद्युम्न जोशी,मुंबई

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा
ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी
आमचा उत्साह द्विगुणीत होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे
६0000 मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.
त्या व्यतिरिक्त संकेतस्थळाला भेट देऊन वाचणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.
हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या
आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा
हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच
एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा
आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

**– ई साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामुल्य ई साप्ताहिके –**

स्वरनेटाक्षरी ऑडिओ अल्बम , बाल नेटाक्षरी , ई श्टाप

**– प्रसिध्द झालेली ई बुक्स –**

टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण,
तो आणि ती,प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान, ई शाळा ,
तो , मी आणि सिगरेट, मोरया, लोकल गोष्टी , मीरा(अनुवाद),ओथंब,सावळ्या मुलीची गाणी

आमची ई बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी - esahity@gmail.com

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी - netaksharee@gmail.com